"एतदर्थ मंडळ - मराठी टंकलेखन व लघुलेखन परीक्षा" या मंडळास मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मटंप-२०१४/१३७/प्र.क्र.५२/भाषा-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ९ जुलै, २०१५

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-टंलेप-१०८८/८४७/२०-ब, दि.५.१.१९८९.
२) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.मभावि-२०१३/प्र.क्र.५१/भाषा-२, दि.१०.१.२०१४.
३) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.मभावि-२०१४/१३७/प्र.क्र.५२/भाषा-२, दि.१२.१२.२०१४.

**शासन निर्णय :-**

राज्य सरकारी कर्मचाऱ्यांच्या मराठी टंकलेखन व मराठी लघुलेखन परीक्षा घेणाऱ्या एतदर्थ मंडळाला मराठी भाषा विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दि.३१.३.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मंडळास कायमस्वरूपी मान्यता देण्याच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मा.मुख्यमंत्री महोदयांनी दि.१.४.२०१५ पासून एक वर्षाकरिता मुदतवाढ दिली आहे. सबब मराठी टंकलेखन व मराठी लघुलेखन परीक्षा घेणा-या एतदर्थ मंडळाला दि.१.४.२०१५ ते दि.३१.३.२०१६ पर्यंत पूर्वलक्षी प्रभावाने मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंडळाची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| | | |
|---|---|---|
| १. | भाषा संचालक,<br>महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | श्री. व.वा. इमानदार,<br>६, आसरा, को. ऑप.हौसिंग सोसायटी<br>वांद्रे (पुर्व), मुंबई-४०० ०५१ | अशासकीय सदस्य |
| ३. | श्री.नरेंद्र तातोबा खंदारे, प्रतिवेदक,<br>महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय | सदस्य |
| ४. | रिक्त | --- |
| ५. | सहायक भाषा संचालक<br>(प्रशिक्षण व आस्थापना)<br>भाषा संचालनालय, मुंबई | सदस्य |

सदर मंडळाच्या बैठकीसाठी होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल. तसेच मंडळाच्या शासकीय सदस्यांना सर्वसामान्य नियमानुसार दैनिक व प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील. अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.३.३.२०१० नुसार प्रवास भत्ता, दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

यासाठी होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या मागणी क्र.झेडएफ-०१, २०५२, सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा, ०० ०९०, सेक्रेटरिएट (००) (००) (०२) भाषा संचालक, १३ कार्यालयीन खर्च, २०५२ ५०६३ या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षात खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक अनौसं-१०९२/१४/व्यय-४, दि.०९.१२.२०१४ अन्वये दिलेले निदेश व त्यावर मा. मुख्यमंत्री यांनी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१३१५३१०४९०३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Leena Vivek Dhuru

Digitally signed by Leena Vivek Dhuru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Leena Vivek Dhuru
Date: 2015.07.13 15:33:18 +05'30'

**लिना वि. धुरू**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे खाजगी सचिव,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
४. प्रबंधक, उच्च न्यायलय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने)
५. प्रबंधक, उच्च न्यायलय, अपील शाखा, मुंबई (पत्राने)
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
७. प्रधानसचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

८. लोकायुक्त, लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई,
११.महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर,
१२.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३.भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.सर्व मंत्रालयीन विभाग
१५.एतदर्थ मंडळाचे सर्व सदस्य (भाषा संचालनालयामार्फत)
१६.निवड नस्ती